विनंती बदली सन २०२३.

सहाय्यक विद्युत निरीक्षक, गट-अ (राजपत्रित)

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन आदेश क्र. बदली-२०२३/प्र.क्र.७४/ऊर्जा-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ३२.
दिनांक:- १४ जुलै, २०२३

**वाचा:-** १) महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांचे बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५.

२) महाराष्ट्र नागरी सेवा ( पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१.

३) सामान्य प्रशासन विभाग, शासन अधिसूचना क्र. एसआरव्ही-२०२०/प्र.क्र.४९/कार्या-१२, दि. १४.०७.२०२१.

**शासन आदेश:-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४ (४) व ४ (५) मधील तरतूदीनुसार व सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने ऊर्जा विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील मुख्य विद्युत निरीक्षक, मुंबई यांच्या कार्यालयातील सहाय्यक विद्युत निरीक्षक, गट-अ (राजपत्रित) यांची त्यांच्या विनंतीनुसार बदलीने पदस्थापना स्तंभ क्र. ४ येथे त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या ठिकाणी करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव व पदनाम | सध्याची पदस्थापना | बदलीनंतर पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | श्री. नितीन रघुनाथ पवार, सहाय्यक विद्युत निरीक्षक | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग क्र. २, ठाणे | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग, रायगड (पेण) अंतर्गत स. वि. नि. या रिक्त पदावर |
| २. | श्री. अर्जुन विश्वनाथ जाधव, सहाय्यक विद्युत निरीक्षक | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग, मुंबई | विद्युत निरीक्षक, उद्वाहन, मुंबई अंतर्गत (कक्ष क्र. ४) येथील स. वि. नि. या रिक्त पदावर |
| ३. | श्री. कपिल व्ही. डांगरे, सहाय्यक विद्युत निरीक्षक | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग, नागपूर | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग, नागपूर अंतर्गत (कक्ष क्र. २) येथील श्री. समीर कावरे यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदावर |
| ४. | श्री. अविनाश बाळु माने, सहाय्यक विद्युत निरीक्षक | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग, सांगली (मिरज) | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग, सातारा अंतर्गत (सातारा जिल्हा) येथील श्री. निलेश मुळूक यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदावर |
| ५. | श्री. निलेश धों. मुळूक, सहाय्यक विद्युत निरीक्षक | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग, सातारा | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग, पुणे अंतर्गत (पुणे जिल्हा) येथील स. वि. नि. या रिक्त पदावर |

२. मुख्य विद्युत निरीक्षक, मुंबई यांनी बदली झालेल्या अधिकाऱ्यांना त्यांच्या बदलीच्या ठिकाणी त्वरीत कार्यभार घेता यावा म्हणून आवश्यक ती स्थानिक पर्यायी व्यवस्था करुन सध्याच्या पदभारातून तात्काळ कार्यमुक्त करावे व त्यांना बदलीच्या ठिकाणी ताबडतोब रुजू होण्यास सांगावे.

३. महाराष्ट्र नागरी सेवा ( पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमांनुसार दिलेल्या विहित कालावधीत संबंधित अधिकारी यांनी पदस्थापनेच्या ठिकाणी रूजू होण्याची दक्षता घ्यावी. अन्यथा या पदस्थापनेच्या पदावर रूजू न झाल्यास, त्यांचा **अनुपस्थितीचा कालावधी हा "अकार्यदिन" (dise non) म्हणून गणला जाईल**. तसेच, संबंधितांविरूध्द शासन निर्णय, क्र. संकीर्ण-२०१६/प्र.क्र.१८६/१६/कार्यासन-१४, दि. २३.१२.२०१६ मधील तरतूदींनुसार शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

४. उपरोक्त अधिकाऱ्यांची बदली त्यांच्या विनंतीनुसार करण्यात येत असल्याने त्यांना पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता व दैनिक भत्ता देय राहणार नाही.

५. संबंधित अधिकाऱ्यास शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणऱ्याही कारणास्तव रजा मंजूर करू नये. तसेच, महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार मुळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारू नयेत.

६. सदरहू आदेशानुसार पदस्थापनेच्या पदावर तात्काळ रूजू न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करणे तसेच त्यामध्ये बदल करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे, ती गैरवर्तणूक समजून त्यांचेविरूध्द शिस्तभंग विषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

७. संबंधित अधिकाऱ्यांनी बदलीच्या पदावर हजर झाल्यानंतर तात्काळ कार्यभार हस्तांतरण प्रमाणपत्रासह त्यांचा रूजू अहवाल मुख्य विद्युत निरीक्षक, मुंबई यांच्यामार्फत विहित मार्गाने शासनास न चुकता विनाविलंब सादर करावा.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०२३०७१४१६०४५६१५१० असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRADIP DATTATRAY BHINTADE

Digitally signed by PRADIP DATTATRAY BHINTADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRY ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=148166d6ba6b6b7506a6c02726418297ae7252d6770d6eeda6fcf82676c59eb5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=70AB5B7C0DEE32FCEE54C2D940368CB9D34A7AEDC3404176B7D9B0082921CFF0, cn=PRADIP DATTATRAY BHINTADE
Date: 2023.07.14 16:06:23 +05'30'

**( प्रदिप भिंताडे )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मुख्य विद्युत निरीक्षक , उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, प्रशासकीय इमारत, ३ रा मजला, रामकृष्ण चेंबुरकर मार्ग, चेंबुर (पू.) मुंबई-७१.
२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र मुंबई/ नागपूर.
३) अधिदान व लेखा अधिकारी मुंबई/निवासी लेखाधिकारी, मुंबई

४) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.

५) अधीक्षक अभियंता, प्रादेशिक विद्युत निरीक्षण मंडळ, मुंबई/पुणे/छ. संभाजीनगर/नागपूर.

६) सर्व संबंधित सहाय्यक विद्युत निरीक्षक (मुख्य विद्युत निरीक्षक, मुंबई यांच्यामार्फत)

**प्रत:**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव.

२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.

३) मा. उपमुख्यमंत्री तथा मा. मंत्री (ऊर्जा) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.

४) प्रधान सचिव (ऊर्जा) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ४०००३२.

५) उपसचिव (ऊर्जा-१), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.

६) निवडनस्ती (ऊर्जा-१).